"जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्प" या योजनेंतर्गत औ.प्र. संस्था, पिंपळनेर येथे सेंटर ऑफ एक्सलन्सची स्थापना करण्यांबाबत...

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्र.जाबँप्र-२०१०/(१७४/१०)/व्यशि-५
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ नोव्हेंबर, २०१०.

संदर्भ :- १) शासन निर्णय क्र.आयटीआय-२००९/(१२/०९)/व्यशि-५, दि.२ सप्टे. २००९.
२) संचालनालयाचे पत्र क्र.२५/जाबॅप्र/२०१०/३४०, दि.१५/७/२०१०
३) राज्य सुकाणू समितीचे दिनांक २७ जुलै २०१० रोजी झालेल्या बैठकीचे कार्यवृत्त.

**प्रस्तावना :-** औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून दिले जाणारे कौशल्य प्रशिक्षण कारखान्यातील तंत्रज्ञानाच्या गरजेशी सुसंगत होण्यासाठी व कौशल्ययुक्त जागतिक दर्जाचे मनुष्यबळ निर्माण करण्यासाठी कारखाने / औद्योगिक संघटना यांच्या सहकार्याने देशातील एकूण ५०० औ.प्र.संस्थाचा दर्जा उंचावून त्यांना "सेंटर ऑफ एक्सलन्स" मध्ये रुपांतरीत करण्याची योजना केंद्र शासनामार्फत सन २००५ पासून सुरु करण्यांत आली आहे. बहुकौशल्ययुक्त कारागीर तयार करणे हे सेंटर ऑफ एक्सलन्स या योजनेचे उद्दिष्ट आहे. सदरहू ५०० औ.प्र.संस्थांपैकी १०० औ.प्र.संस्थांना केंद्र शासनामार्फत (सन २००५-०६) तर उर्वरीत ४०० औ.प्र.संस्थांना जागतिक बँकेच्या सहाय्याने अर्थ सहाय्य केंद्र शासनामार्फत उपलब्ध करण्यांत येत आहे.

उपरोक्त केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार "जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्प" या योजने अंतर्गत संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ नुसार औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पिंपळनेर या संस्थेस फक्त व्यवसाय दर्जावाढ करण्यास मान्यता देण्यांत आलेली आहे. सदर संस्थेत ऑगस्ट २००९ च्या सत्रात सेंटर ऑफ एक्सलन्स अंतर्गत प्रवेश देण्यांत आलेले असून सदर प्रशिक्षणार्थ्यांनी सप्टेंबर २०१० मध्ये ॲडव्हान्स मोडयुलमध्ये प्रवेश घेतलेले आहेत. औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पिंपळनेर, जि.धुळे या संस्थेत "इलेक्ट्रिकल" या सेक्टरचे सेंटर ऑफ एक्सलन्स व संलग्न व्यवसायांचा दर्जावाढ करण्याबाबतचा प्रस्तावास राज्य सुकाणू समितीच्या दिनांक २७ जुलै २०१० बैठकीमध्ये मान्यता देण्यांत आलेली आहे. सदरहू प्रस्ताव राष्ट्रीय सुकाणू समितीच्या मान्यतेसाठी DGET, New Delhi यांच्याकडे सादर केलेला आहे. प्रवेशित प्रशिक्षणार्थ्यांना भविष्यात अडचणी निर्माण न होण्याच्या दृष्टीने राष्ट्रीय सुकाणू समितीच्या मान्यतेच्या अधीन राहून औद्योगिक प्रशिक्षण

संस्था, पिंपळनेर या संस्थेत "इलेक्ट्रिकल" या सेक्टरचे सेंटर ऑफ एक्सलन्स व संलग्न व्यवसायांचा दर्जावाढ करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** "जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय प्रशिक्षण सुधारणा प्रकल्प" या योजने अंतर्गत राष्ट्रीय सुकाणू समितीच्या मान्यतेच्या अधीन राहून औ.प्र.संस्था, पिंपळनेर, जि.धुळे या संस्थेमध्ये फक्त व्यवसाय दर्जावाढ ऐवजी "इलेक्ट्रिकल" या सेक्टरचे सेंटर ऑफ एक्सलन्स व संलग्न व्यवसायांचा दर्जावाढ करण्यास या शासन निर्णयाद्वारे पूर्वलक्षी प्रभावाने मान्यता देण्यांत येत आहे.

२. ब्रॉड बेस बेसिक प्रशिक्षणासाठी रुपांतरीत करावयाच्या व्यवसाय अभ्यासक्रमाचा तपशिल प्रपत्र "अ" मध्ये दर्शविण्यांत आलेला आहे. प्रत्येक ब्रॉड बेस बेसिक मोडयुलची प्रवेश क्षमता १६ राहील. सदर औ.प्र.संस्थेमधील सेंटर ऑफ एक्सलन्समध्ये सोबतच्या प्रपत्र "ब" नुसार निवडलेले ॲडव्हान्स मोडयुल अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्यांत येत आहे.

हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१०११०६१४२१२०००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

उर्मिला जोशी
(उ. वै. जोशी)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपाल यांचे मुख्य सचिव, राजभवन, मुंबई.
मा.मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव.
सचिव, श्रम व रोजगार मंत्रालय, श्रमशक्ती भवन,भारत सरकार, नवी दिल्ली.
सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२.
संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहसंचालक / उपसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नागपूर / अमरावती / औरंगाबाद / नाशिक [संचालक (प्रशिक्षण) यांचेमार्फत]
जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, धुळे
महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पिंपळनेर, जि.धुळे [संचालक (प्रशिक्षण) यांचेमार्फत]
नियोजन / वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन व्यशि-१,२,३,४.
निवड नस्ती/व्यशि-५

**शासन निर्णय क्र.जाबँप्र-२०१०/(१७४/१०)/व्यशि-५, दिनांक ०६ सप्टेंबर २०१० चे सहपत्र.**

## प्रपत्र-अ

## जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय शिक्षण सुधारणा प्रकल्पांतर्गत पाचव्या टप्प्यातील खालील संस्थेमध्ये सेक्टर नुसार सेंटर ऑफ एक्सलन्समध्ये रुपांतरीत करावयाच्या व्यवसायाचा तपशिल.

| अ. क्र. | औ.प्र. संस्थेचे नांव | सेक्टरचे नांव | रुपांतरीत करण्यांत येणा-या नियमित व्यवसाय तुकडयांचा वापर सेंटर ऑफ एक्सलन्स अंतर्गत खालील ब्रॉड बेस बेसिक मोडयुलसाठी करावयाचे आहे. | रुपांतरीत करावयाचे व्यवसाय अभ्यासक्रमाचे नांव व संख्या | तुकडी संख्या | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | पिंपळनेर, जि. धुळे | इलेक्ट्रीकल | बेसिक इंजिनिअरिंग स्किल | * | १ | ब्रॉड बेस बेसिक मोडयुलची तुकडी नव्याने सुरु करणे * |
| | | | बेसिक इलेक्ट्रिकल इंजिनिअरिंग | * | १ | ब्रॉड बेस बेसिक मोडयुलची तुकडी नव्याने सुरु करणे * |
| | | | बेसिक इलेक्ट्रॉनिक्स | * | १ | ब्रॉड बेस बेसिक मोडयुलची तुकडी नव्याने सुरु करणे * |
| | | | बेसिक वायरींग अँड वायंडिंग | वायरमन | १ | |
| | | | बेसिक पॉवर जनरेशन ट्रान्समिशन अँड डिस्ट्रिब्युशन | * | १ | ब्रॉड बेस बेसिक मोडयुलची तुकडी नव्याने सुरु करणे * |
| | | | बेसिक कॉम्प्युटर ऑपरेटिंग स्किल अँड इटस ॲप्लीकेशन | डाटाएँट्री ऑपरेटर | १ | |

टिपः- * ब्रॉड बेस बेसिक मोडयुलची तुकडी डीपीडीसी / आदिवासी उपयोजनेमधून सुरु करण्यांत येणार आहे.

## प्रपत्र-ब

## जागतिक बँक सहाय्यित व्यवसाय शिक्षण सुधारणा प्रकल्पांतर्गत पाचव्या टप्प्यातील खालील औ.प्र.संस्थेमध्ये सन २०१०-११ पासून सुरु करावयाचे प्रस्तावित ॲडव्हान्स मोडयुल.

| अ. क्र. | औ.प्र. संस्थेचे नांव | सेक्टरचे नांव | औ.प्र.संस्थेमध्ये निवडलेले ॲडव्हान्स मोडयुल | पवेश क्षमता प्रति तुकडी | तुकडयांची संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ | पिंपळनेर, जि. धुळे | इलेक्ट्रिकल | ऑपरेशन अँड मेंटेनन्स ऑफ इक्युपमेंट युजड इन हाय टेंशन लाईन, लो टेंशन लाईन सबस्टेशन अँड केबल जॉइन्टींग | १६ | २ |
| | | | रिपेअर अँड मेटेनन्स ऑफ इलेक्ट्रिकल मशिन अँड पॉवर सप्लाय | १६ | २ |
| | | | नॉन कन्व्हेन्शनल पॉवर जनरेशन बॅटरी अँड इन्व्हेटर | १६ | २ |

उर्मिला जोशी